**सिंचन प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात सुक्ष्म सिंचनाचे अंतिम उद्दिष्ट ठेवून वितरण व्यवस्था करण्याचे धोरण.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१५/(५५०/४/१५)/सिं.व्य.(धोरण)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - ०२ मे, २०१७

**१.० प्रस्तावना–**

राज्यातील वापरायोग्य पाणी मर्यादित असून सिंचनासाठी उपलब्ध होणाऱ्या पाण्यातून सिंचन प्रकल्पाद्वारे प्रवाही पध्दतीने जास्तीत जास्त ८५ लक्ष हेक्टर इतके म्हणजे एकूण लागवडी योग्य क्षेत्राच्या ३७.३७% एवढेच सिंचन क्षेत्र निर्माण होऊ शकेल असा अंदाज आहे. याशिवाय भूजलामधून जलसंधारण, स्थानिक स्तर व कृषि विभागाच्या कार्यक्रमाद्वारे प्रकल्पांतून ४१ लक्ष हेक्टर निर्माण होईल असे अपेक्षित आहे. म्हणजे सर्व स्त्रोतांमधून राज्यात जास्तीत जास्त १२६ लक्ष हेक्टर म्हणजे एकूण लागवडी योग्य क्षेत्राच्या ५६% इतके सिंचन क्षेत्र निर्माण होऊ शकणार आहे.

भारतातील सिंचन क्षमतेची राष्ट्रीय सरासरी ७६.४४% असून किमान त्यापर्यंत जाण्यासाठी राज्यातील कृषी/सिंचन क्षेत्रातील पाणी वापराची कार्यक्षमता वाढविण्याशिवाय पर्याय नाही. यासाठी संपुर्ण सुक्ष्म सिंचनाचे दिर्घकालीन उद्दिष्ट ठेऊन सध्याचे प्रवाही सिंचन पध्दतीचे परिवर्तन टप्प्याटप्प्याने सुक्ष्म सिंचनात करणे, तसेच बांधकामाधीन व भविष्यकालीन सिंचन प्रकल्पांची वितरण व्यवस्था सुक्ष्मसिंचन पध्दत विचारात घेऊन संकल्पित करणे अनिवार्य आहे.

सध्या सिंचन प्रकल्पातून शेतीसाठी प्रवाही सिंचन पध्दतीने पाणी पूरविण्याचे धोरण असून त्यादृष्टीने लाभक्षेत्रात वितरण व्यवस्था निर्माण केली जाते. प्रवाही सिंचन पध्दतीमध्ये कालव्यांचे संकल्पन ३० ते ४० दिवसाच्या कालांतराचे आवर्तन विचारात घेऊन केले जाते. सुक्ष्म सिंचन पध्दतीस प्रोत्साहन देणेसाठी दररोज शाश्वत पाणी उपलब्ध करुन देणे गरजेचे आहे. पारंपारिक सिंचन प्रकल्पांचे कालवे प्रवाही सिंचन पध्दतीने पाणी वितरणासाठी संकल्पित केलेले असल्याने त्यामधून सुक्ष्म सिंचनासाठी दररोज पाणी उपलब्ध करणे तांत्रिकदृष्टया शक्य होत नाही.

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाने अधिनियमातील कलम १४(४) नुसार जून २०१९ पासून पुढे राज्यातील बारमाही पिकांना सुक्ष्मसिंचनाद्वारे पाणी पुरवठा करणे बंधनकारक केलेले आहे. त्याची अंमलबजावणी करण्यासाठी सिंचन प्रकल्पांच्या पारंपरिक वितरण पध्दतीमध्ये सुधारणा करुन सुक्ष्म सिंचनासाठी लाभक्षेत्रात जागोजागी विकेंद्रीत जलसाठे निर्माण करुन त्याद्वारे शाश्वत पाणी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

वरील बाबी विचारात घेऊन सिंचन प्रकल्पांची वितरण व्यवस्था सुक्ष्म सिंचन पध्दतीस पूरक करणेबाबतचा धोरणात्मक निर्णय दिनांक ०९.०३.२०१७ रोजीच्या मा.मंत्रीमंडळ बैठकीत शासनाने घेतला आहे. त्यानूसार लाभक्षेत्रामध्ये सुक्ष्मसिंचनास प्रोत्साहन देण्यासाठी जागोजागी विकेंद्रीत जलसाठे (decentralised storages) निर्माण करून त्याव्दारे सुक्ष्मसिंचनास गरजेनूसार पाणी उपलब्ध करून देण्याची शाश्वत व्यवस्था निर्माण करण्याचे धोरण आहे. विकेंद्रीत जलसाठ्यामधून लाभार्थींनी स्वत:च्या यंत्रणेव्दारे/ पंपाव्दारे पाणी उपसा करून त्यांच्या शेतातील शेततळे/ विहीरी मध्ये साठवावे व सुक्ष्मसिंचन संचाव्दारे पिकांना पाणी पूरवठा करावा. वितरण व्यवस्थेचे नविन धोरण हे लवचिक असून त्यामुळे लाभधारकांना त्यांच्या नियोजनानूसार पिकांचे नियोजन करणे शक्य

होईल, महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन कायद्याव्दारे पाणीवापर संस्था निर्माण करणे व सिंचन व्यवस्थापनामध्ये लाभधारकांचा सक्रिय सहभाग वाढविणे , प्रकल्पांचे लाभ जनतेला लवकर देणे व सिंचन व्यवस्थापनामधील शासन यंत्रणेचा हस्तक्षेप कमी करणे इत्यादी महत्वाची उद्दीष्टे साध्य होऊ शकतील.

**शासन निर्णय–**

१.० राज्यात सिंचन प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात सुक्ष्मसिंचन पध्दत राबविणे हे शासनाचे अंतिम उद्दिष्ट असून, ते साध्य करण्यासाठी सुक्ष्म सिंचनास पुरक वितरण व्यवस्था निर्माण करण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे.

१.१ सुक्ष्म सिंचनास शाश्वत पाणी उपलब्ध करुन देण्यासाठी लाभक्षेत्रात जागोजागी सर्वसाधारणपणे १०० हेक्टरचे चक (Block) करुन त्या क्षेत्रास किमान १५ दिवस पुरेल इतक्या क्षमतेचे विकेंद्रीत जलसाठे निर्माण करावेत.

१.२ प्रकल्पाच्या लाभक्षेत्रामध्ये, जलसंपदा विभाग, जलसंधारण, स्थानिक स्तर व कृषी विभागामार्फत पूर्ण झालेले व यापुढे पूर्ण होणारे लघु पाटबंधारे तलाव, पाझर तलाव, गांव तलाव, बंधारे इत्यादींचा उपयोग विकेंद्रीत जलसाठे म्हणून प्राधान्याने करावा. या जलसाठ्यात पाणी भरण्यासाठी नैसर्गिक नाल्यांचा उपयोग पोहच कालवे (Feeder Canal) म्हणुन करावा.

जलसाठ्यांच्या साठवण क्षमतेनुसार त्यांचे लाभक्षेत्र व ते भरुन देण्याची वारंवारता निश्चित करावी. उर्वरीत लाभक्षेत्रासाठी आवश्यकतेनुसार नविन विकेंद्रीत जलसाठे निर्माण करावेत. कालव्याद्वारे प्रवाही पध्दतीने विकेंद्रीत जलसाठे भरुन देणे शक्य होईल, यादृष्टीने विकेंद्रीत जलसाठयाचे ठिकाण निश्चित करावे. तांत्रिक दृष्टया शक्य असेल तेथे विकेंद्रीत जलसाठे भरुन देण्यासाठी पाईप लाईनचा वापर करावा.

१.३ नव्याने निर्माण करावयाच्या विकेंद्रीत साठ्यासाठी सुयोग्य शासकीय जमीन उपलब्ध असल्यास ती प्रधान्याने वापरावी अन्यथा आवश्यक खाजगी जमिनीचे संपादन प्रकल्प खर्चातून करावे.

१.४ लाभक्षेत्रातील पूर्ण व बांधकामाधीन असलेले लघु पाटबंधारे तलाव, पाझर तलाव, गांव तलाव, बंधारे हे ज्या नैसर्गिक नाल्यावर बांधलेले आहेत, तो नाला मुख्य कालव्यास /शाखा कालव्यास वरील भागात ज्या ठिकाणी छेदतो, तेथे शिर्ष विमोचकाद्वारे घनमापन पध्दतीने मोजून नाल्यात पाणी सोडण्याची व्यवस्था करावी. नाल्यात सोडलेले पाणी लघु पाटबंधारे तलाव, बंधारे, गांव तलाव, पाझर तलाव यामध्ये आवश्यक विसर्गाने पोचविण्यासाठी नाला रुंदीकरण व इतर कामे संकल्पनानुसार शक्यतो जलसंधारण/ जलयुक्त शिवार कार्यक्रमातून करावीत व ते शक्य नसेल तरच प्रकल्प खर्चाने करण्याचा निर्णय महामंडळस्तरावर घ्यावा.

१.५ राज्यात अतिपावसाच्या प्रदेशात, विशेषत: जेथे भाताचे पिक घेतले जाते तेथील सिंचन प्रकल्पावर पारंपरिक वितरण प्रणाली अथवा सुक्ष्म सिंचन वितरण प्रणाली बांधण्याबाबतचा निर्णय स्थानिक लोकप्रतिनिधी व लाभधारकांबरोबर विचार विनिमय करुन महामंडळस्तरावर घ्यावा. त्यामध्ये सध्याची व भविष्यातील पिकरचना आणि शेतीच्या तंत्रज्ञानामध्ये भविष्यात होणारे बदल याचा विचार करावा.

२.० बांधकामाधीन प्रकल्पांच्या बाबतीत वितरण व्यवस्थेची सद्यस्थिती, झालेले भू-संपादन तसेच अस्तीत्वात असलेले करार या सर्वाचा परामर्श घेऊन तसेच लाभार्थींशी विचार विनिमय करुन संपूर्ण सुक्ष्मसिंचनाचे दिर्घकालीन उद्दिष्ट ठेऊन वितरण व्यवस्थेच्या आराखडयात आवश्यक बदल करावेत. याबाबतचा निर्णय कालव्याची संरेखा मंजूर करण्यास सक्षम अधिकाऱ्याने घ्यावा. असे करतांना झालेल्या कामाचा व संपादित जमिनीचा इष्टतम वापर होईल हे पहावे.

३.० प्रवाही सिंचन क्षमता निर्माण झालेल्या पूर्ण व बांधकामाधीन प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील प्रवाही वितरण व्यवस्थेचे रुपांतरण सुक्ष्म सिंचनासाठी पूरक व्यवस्थेमध्ये स्थानिक परिस्थिती विचारात घेऊन टप्प्याटप्प्याने करावे. त्यासाठी लाभक्षेत्रातील पाणी वापर संस्था व वैयक्तीक लाभधारकांच्या एकत्रित बैठका घेऊन सर्वसहमतीने रुपांतराचा बृहत आराखडा तयार करावा. अशा प्रकारच्या रुपांतरणाच्या प्रकल्पनिहाय बृहत आराखडयास महामंडळस्तरावर मान्यता द्यावी.

४.० लेखे चालू असलेल्या बांधकामाधीन प्रकल्पांवर, वितरण प्रणाली रुपांतराचे काम प्रकल्पाच्या खर्चातून करावे. पूर्ण झालेल्या प्रवाही वितरण व्यवस्थेचे रुपांतरण सुक्ष्म सिंचन वितरण प्रणालीमध्ये करण्यासाठी येणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र अंदाजपत्रक करुन त्यास महामंडळस्तरावरुन मान्यता देण्यात यावी. आवश्यकतेनुसार या तरतुदीसह प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

लेखे बंद झालेल्या पूर्ण प्रकल्पाच्या रुपांतराचा खर्च महामंडळास उपलब्ध होणाऱ्या योजनांतर्गत निधीतून स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करुन प्रचलित पध्दती अनुसरुन रुपांतराच्या कामास प्रशासकीय मान्यता घेऊन करावा.

५.० महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ कलम ७ नुसार विकेंद्रीत जलसाठयाच्या लाभक्षेत्रावर पाणी वापर संस्था स्थापन कराव्यात. लाभक्षेत्रातील नाल्यावर एकापेक्षा जास्त विकेंद्रीत जलसाठे असल्यास नाल्याच्या संपूर्ण पाणलोट क्षेत्रासाठी (सर्व विकेंद्रीत जलसाठयासाठी) एकच पाणी वापर संस्था स्थापन करावी. वरीलपेक्षा वेगळी स्थानिक परिस्थिती असल्यास पाणी वापर संस्थांचे कार्यक्षेत्र सरमिसळ होणार नाही याद्दष्टीने पाणी वापर संस्था स्थापन कराव्यात. मात्र, याबाबतचा निर्णय लाभार्थींशी विचार विनिमय करुन घ्यावा.

६.० राज्यातील सिंचन हे सूक्ष्मसिंचन पध्दतीने करणे व राज्याचे सिंचन क्षेत्र भारताच्या राष्ट्रीय सरासरी पर्यंत (७६.४४%) वाढविणे हे शासनाचे अंतिम उद्दिष्ट आहे. त्यासाठी प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात उपलब्ध होणारे कालव्याचे पाणी, पावसाचे पाणी व भूजलाच्या एकात्मीक वापराचे नियोजन करावे (Integrated Water Use).

७.० सिंचन प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात जलसंधारण, स्थानिकस्तर व कृषी विभागामार्फत पूर्ण झालेले लघु पाटबंधारे तलाव, गांव तलाव, पाझर तलाव व बंधारे संबंधित विभागांनी सिंचन व्यवस्थापनासाठी जलसंपदा विभागाकडे हस्तांतरीत करावेत.

८.० विकेंद्रीत जलसाठयामध्ये घनमापन पध्दतीने पाणी भरुन देण्याची व्यवस्था झाल्यानंतर व तेथे पाणी वापर संस्था स्थापन झाल्यावर, विकेंद्रीत जलसाठयावरील लाभक्षेत्राइतकी सिंचन क्षमता निर्माण झाल्याचे घोषीत करावे व प्रकल्पाची व्याप्ती विकेंद्रीत जलसाठया मध्ये पाणी

उपलब्ध करून देण्यापर्यंत मर्यादीत करावी. विकेंद्रीत जलसाठ्यामधून पाणी वापर संस्थेच्या सभासदांनी स्वत:च्या यंत्रणेव्दारे / पंपाव्दारे पाणी उपसा करून पिकांच्या गरजेनूसार वापर करावा.

सदर शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कृषि विभाग, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०२१६३४५६५६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S M Upase

Digitally signed by S M Upase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary (CAD), postalCode=400032, st=Maharashtra, cn=S M Upase
Date: 2017.05.02 16:36:09 +05'30'

**( शि. मा. उपासे )**

सचिव (लाक्षेवि), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानपरिषद, विधान भवन, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
८) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
१०) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
११) प्रधान सचिव, वित्त विभाग /नियोजन विभाग/ ग्राम विकास व जलसंधारण विभाग/ कृषी विभाग
१२) स्वीय सहायक, प्रधानसचिव (जसंप्र व वि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) स्वीय सहायक,सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
१६) मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) सर्व मुख्य अभियंते, जलसंपदा विभाग.
१८) उप सचिव (सिंव्य) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.

२०) सर्व कार्यकारी अभियंते, जलसंपदा विभाग.
२१) सर्व तांत्रिक कार्यासन, जलसंपदा विभाग
२२) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२३) निवडनस्ती कार्यासन सिं.व्य. (धोरण).